



देवी आदीशक्तीकडे दूत रूपात गेलेला तारकासुर परतलेला पाहून मदासुरास अतीव आनंद झाला. उपास्य देवतेचा काय निरोप आला हे जाणून घेण्यास उत्सुक अशा त्याने सगळ्यांसह विचारल्यावर तारकासुर प्रणाम करून सर्व वृत्तान्त कथन करता झाला.

देवी असुरांची कुलदेवता असूनही त्यांचा पक्ष घेत नाही म्हटल्यावर संतप्त झालेल्या मद्यप्राशी मदासुराने देवतासेना हननाचा संकल्प सोडला. समस्त सेनानायकांसमवेत एखाद्या महाकालाने आक्रमण करावे तशा रीतीने तो शक्तिलोकावर चालून गेला. त्या वादळवाऱ्यात शक्तिलोकाचे संरक्षणकर्ते गण एखाद्या कस्पटासमान भासले. जे उरले त्यांना आत वार्ता दिली आणि पर्यवसानरूपात ती महिषासुर-मर्दिनी शंकरादिकांसह रणांगणावर आली.

सिंहारूढ असणाऱ्या, चतुर्भुजाधारी जगदंबेने हाती खड्ग तथा ढाल आणि धनुष्यबाण धारण केले होते. तिच्या समवेत अनेक शक्ती विराजित होत्या. तिच्या वामांगातून देवी श्री तथा दक्षिणांगातून देवी सावित्री प्रगट झाली. हृदयापासून देवी संज्ञा उत्पन्न झाली. त्यांनी आपापले अपरिमित सैन्य प्रगट करून रणांगणाचा ताबा घेतला. शंकर, विष्णू इत्यादी महेश्वरही आपापल्या वाहनांवर आरूढ झाले. दैत्यांनी ती देवसेना पाहताच त्यांचा आवेश अधिकच वाढला व त्यांनी भयानक शस्त्रांचा ओघच प्रवाहित केला. आदिशक्तीने आपल्या देवसेनेलाही आक्रमणाचा आदेश दिला आणि कालिका इ. देवतागण भीषण क्रुद्धतेने दैत्यांवर तुटून पडले. अकस्मात इतके भयानक युद्ध रंगले की त्या सैन्याच्या संचालनाने उडालेल्या अफाट धुळीने सर्व आसमंत व्यापून टाकला. सर्वत्र अंधार पसरला. कोण आपला आणि कोण परका ही जाणीवही लोपलेले सैन्य केवळ त्वेषाने झुंजत होते. घोड्यांचे खिंकाळणे, रथांची घरघराट, रणदुंदुभीचे चित्कार, या सगळ्यांनी दिशा जणू भरून गेल्या. तो आवाज इतका पराकोटीला पोहोचला कीं सैन्याचे कान जणू बधिर झाले.

कोणी शस्त्र चालवित होते. कोणी अस्त्र फेकत होते. कोणी पर्वत आणि वृक्ष भिरकावत होते. परस्परांचा प्राणनाश इतकेच ध्येयं असलेल्या त्या उभय सेनांनी अनेकांचा जीव घेतला. अगणिक जायबंदी झाले. बाण, खड्ग, परशू, तोमर, भिंदिपाल, पाश अशा अनेक शस्त्रास्त्रांचा वापर होऊ लागला. गज, अश्व, रथ, पद, अशी चारही दले आता नियम

बाजूला पाडून कोणीही कोणाशीही लढू लागले. त्या भयावह संहाराने रक्ताच्या ज्या चिळकांड्या आसमंतात उडाल्या त्याने भिजलेली धूळ खाली बसली आणि मग प्रकाश पडून कोण कोण आहे ते कळू लागले.

मग दैत्य कुठे आहेत त्यांचा शोध घेत देवतांनी त्यांना टिपण्यास आरंभ केला. शक्तीसैन्याने भीषण संतापाने आक्रमण करीत राक्षसी सेनेचा चुराडा केला. रक्ताच्या नद्या वाहू लागल्या. त्या शेजारी चरबीचा चिखल साचला. प्रेते तरंगू लागली, मृत गज बेटाप्रमाणे भासू लागले. सर्वत्र वर्णनातीत भयानक दृश्य दिसू लागले.

एकाक्षणी देव सैन्य पराजित होत आहे आणि पळून जात आहे असे पाहून देवराज इंद्र वज्र धारण करून लढू लागले. वज्राघाताने दैत्यांना यमसदनी धाडू लागले. अग्नी चंद्र इत्यादी देवताही विविध शस्त्रांचा मारा करू लागल्या. त्यावेळी दैत्यसेनेच्या त्या कर्दनाने संतप्त झालेला तारकासुर दुसरीकडून लढाईला उतरला. तो देवराजांना म्हणाला- अरे इंद्रा! तू माझ्याशी काय लढशील? माझ्या एकाच बाणात विद्ध होशील. आता मोठ्या उमेदीने लढायला आला आहेस. इतका शूर होतास तर आरंभी अमरावती सोडून का पळालास? उत्तर दे. अन्यथा वृथा मारला जाशील.

त्याचे ते अपमानकारक वचन ऐकून देवराज त्याला खाऊ की गिळू अशा नजरेने पाहू लागले. म्हणाले- तारका! आपल्या बळाच्या वल्गना करतोस, तर आता माझा पराक्रम पाहाच. आधी तुझे सैन्य मारीन आणि मग हे मदोद्धता, मी तुझा वध करीन. आणि मगच मी शक्तीला अभिवादन करून अमरावतीत जाऊन राज्य करीन. प्रथम आम्ही शक्तिरहित होतो. अत: पराजित झालो. आता आम्ही तुमची हत्या केल्याशिवाय राहणार नाही. तेव्हा आता उगाच बोलण्यापेक्षा एकतर पराक्रम दाखव किंवा थेट पाताळात परत जा.

***